**पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस अधीक्षक या अस्थायी पदास मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-३६१८/प्र.क्र.१६/ पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० सप्टेंबर, २०२१.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-०१/२००१/प्र.क्र.४३/पोल-१अ, दि. ११.०५.२००१.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-१३०८/प्र.क्र.२२८/पोल-१अ, दि. २२.१०.२००९.
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-१७१७/प्र.क्र.३७५/पोल-१अ, दि. २८.१२.२०१७.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०१.२०१८.
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.१६/पोल-३, दि. १०.०४.२०१८.
६) शासन निर्णय, गृह विभाग क्र.अेपीओ-३६१७/प्र.क्र.११७/पोल-३, दि. १०.०५.२०१८.
७) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.१६/पोल-३, दि.२१.०९.२०२०.
८) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.१६/पोल-३, दि.२४.०३.२०२१.
९) सहायकर पोलीस महानिरीक्षक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/ मुदतवाढ/सपोमनि (आस्था)/८०/२०१६, दि.२६.०७.२०२१.
१०) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/आ.पु.क., दि.१०.०८.२०२१.

**शासन निर्णय:-**

राज्य पोलीस दलाच्या पुनर्रचनेअंतर्गत उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ येथे नमूद दिनांक ११.०५.२००१ च्या शासन निर्णयान्वये पोलीस अधीक्षक/पोलीस उपआयुक्त या संवर्गात ३० पदे निर्माण करण्यात आली असून, उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद ३० पदांपैकी अ.क्र.१३ ते १९ येथे नमूद अतिरिक्त समादेशक, राज्य राखीव पोलीस बल या ७ पदांचे उपरोक्त संदर्भाधिन क्र.२ येथे नमूद दिनांक २२.१०.२००९ च्या शासन निर्णयान्वये फेरवाटप करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर फेरवाटप केलेल्या ७ पदांपैकी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक पोलीस महानिरीक्षक (आस्था) या अस्थायी पदास उपरोक्त संदर्भाधिन क्र.५ येथे नमूद दिनांक १०.०४.२०१८ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भाधिन क्र.६ येथे नमूद दिनांक १०.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सहायक

पोलीस महानिरीक्षक (आस्थापना), हे पद अपर पोलीस महासंचालक(आर्थिक गुन्हे), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस अधीक्षक या पदात स्थानांतरीत/वर्ग करण्यात आले आहे असून सदर पद अस्थायी स्वरूपाचे आहे. सदर पदास उपरोक्त संदर्भाधिन क्र.८ येथे नमूद दिनांक २४.०३.२०२१ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२१ ते दि.३१.०८.२०२१ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली आहे. सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधिन क्र.९ येथे नमूद दिनांक २६.०७.२०२१ च्या पत्रान्वये पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील पोलीस अधीक्षक या पदास दि.०१.०९.२०२१ पासून मुदतवाढ मिळणेबाबत विनंती केली आहे.

२. उक्त पदे ज्या परिस्थितीत निर्माण करण्यात आली होती ती परिस्थिती अद्यापही कायम आहे. यास्तव, उक्त पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस अधीक्षक या पदास **दिनांक ०१.०९.२०२१ ते दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर २००१ आणि क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १९ ऑगस्ट २००४ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ शासनास सादर करण्यात यावा.

२) आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा.

३) कोणत्याही परिस्थितीत सर्व पदांचा आढावा उच्चस्तरीय समितीसमोर ठेवून मान्यता घेण्याबाबत वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.१० येथील दिनांक १०.०८.२०२१ च्या शासन निर्णयानुसार सूचित केलेले आहे. ही बाब विचारात घेता दिनांक २८.०२.२०२२ अखेर पर्यंत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास, उपरोक्त अस्थायी पदाला त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहिल.

३. सदरचा खर्च “२०५५-पोलीस-००१-संचालन व प्रशासन(००)(०१)-पोलीस निरीक्षणालय” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो **सन २०२१-२२** या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/आपुक., दिनांक १०.०८.२०२१ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९३०१९३२१४५८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rupali Sanjog Kabare

Digitally signed by Rupali Sanjog Kabare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, serialNumber=5cb43a03d973ff96aabbf02a74864a4681399fe663d8fbde0441a596beb3acdd, cn=Rupali Sanjog Kabare
Date: 2021.09.30 19:33:12 +05'30'

**( रूपाली कबरे )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
५. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
६. गृह विभाग, कार्यासन (पोल-१अ).
७. वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
८. निवड नस्ती (पोल-३).